229 20150423120~~[illegible]~~
/2/2227

**ता.अकोले, जि.अहमदनगर येथील चिंचोडी उपसा सिंचन योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- उसियो २००८/(३६३/२००८) खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १६/१०/२००८

पहावे :- १) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे दिनांक २५.६.२००८ चे पत्र क्रमांक गोमपाविम/चिंचोडी उसियो/सुप्रमा/तां-५/१२११६/०५

**प्रस्तावना :-**

चिंचोडी उपसा सिंचन योजना, ता.अकोले, जि.अहमदनगर या योजनेस शासन निर्णय क्रमांक उसियो२०००/१८३/२०००/ खारभूमी दिनांक २४.१०.२००१ अन्वये रुपये १५७.३७ लक्ष रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर योजना आदिवासी क्षेत्रातील आहे. योजनेचे काम "सी.टन.की." पध्दतीच्या निविदेव्दारे दिनांक ९.४.२००३ पासून सुरू करण्यात आले. या योजनेच्या प्रारूप आराखडयास मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांच्या तांत्रिक तपासणी नंतर मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांनी मान्यता दिली आहे. त्याचप्रमाणे दरसूचीतील दरवाढ, जास्त दराची निविदा स्विकृती, संकल्पचित्रातील बदल, व्याप्तीतील बदल इतर कारणे व अनुषांगिक खर्चातील वाढ या कारणांमुळे योजनेच्या किंमतीत वाढ होत आहे. त्यामुळे सन २००७-०८ ची दरसूचीवापरुन योजनेचे सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रूपये ३३०.०० लक्ष किंमतीच्या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांच्याकडून प्राप्त झाला व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

आता या शासन निर्णयान्वये चिंचोडी आदिवासी उपसा सिंचन योजना, ता.अकोले, जि.अहमदनगर या योजनेस सन २००७-२००८ वर्षाच्या दरसुचीवर आधारित सुधारित केलेल्या प्राक्कलनानुसार कामाच्या एकुण अंदाजित रूपये ३,३०,००,५८२/- (रूपये तीन कोटी, तीस लक्ष, पाचशे ब्याऐंशी फक्त) यापैकी रूपये २,६३,४९,०६८/- कामाप्रित्यर्थ व रूपये ६६,५१,५१४/- अनुषंगिक

खर्च या रक्कमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशिर्षवार तरतूदीचा तपशिल सोबत परिशिष्टामध्ये देण्यात आलेला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशिर्ष "४७०२ लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च ८००-इतर खर्च योजना पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका(४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान योजनांतर्गत(संगणक सांकेतांक क्र. ४७०२/४९९-२) " या लेखांशीर्षाखाली खर्ची टाकावा व गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाकडे उपलब्ध होणाऱ्या तरतूदीतून परस्पर भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय क्रमांक संकिर्ण १०९९/(१२९/९९) मोप्र (प्र) दिनांक १८/५/१९९९ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता (३२/२००८) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(रा.च.हुनणे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक.
आतंर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (लपा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग क्र.२, संगमनेर
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, अहमदनगर
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

d:Kharbhumi;Humane;Chichodi

शासन निर्णय क्रमांक उसिंयो २००८/(३६३/२००८) खारभूमी दि.१६/१०/२००८ चे परिशिष्ट

चिंचोडी उपसा सिंचन योजना, ता.अकोले, जि.अहमदनगर अंदाजपत्रकाचा गोषवारा

| क्रमांक | शिर्ष / उपशिर्ष | मुख्य व शाखा कालवे | एकूण रुपयात |
|---|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | १०००० | १०००० |
| २ | "ब" (भूसंपादने) | ६४४० | ६४४० |
| ३ | "सी" मुख्य कामे | -- | २५७१७५०३ |
| | ३.१) इनटेक वेल व पंप हाऊस स्टेज-१ | २२९१९०४ | -- |
| | ३.२) पंपहाऊस स्टेज-२ | ७६१८९२ | -- |
| | ३.३) रायझिंग मेन | ९०२८५२४ | -- |
| | ३.४) डिलीव्हरी चेंबर | ८९६८३२ | -- |
| | ३.५) मेकॅनिकल व इलेक्ट्रिकल पोशन | ८७८०८४८ | -- |
| | ३.६) डिस्ट्रीब्युशन सिस्टिम | ३९५७५०३ | -- |
| ४ | "पी" देखभाल | १०००० | १०००० |
| ५ | सी कांन्टीजेन्सीज | | ३५८७७० |
| ६ | डब्ल्यु.सी.आस्थापना | -- | २४६३५५ |
| | कामाप्रित्यर्थ किमत | -- | २६३४९०६८ |
| | अनुषांगिक खर्च (२५.२५ टक्के भूसंपादन वगळून) | | ६६५१५१४ |
| | योजनेची एकूण किमत | | ३३०००५८२ |

**ठळक वैशिष्टये**

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता(पिकक्षेत्र) | २५७ हेक्टर (३८१ हेक्टर) |
| नियोजित पाणीसाठा वापर | १००० सघमी |
| प्रती हेक्टरी किंमत (रु) | ८५८२७ < ८६८०० (मापदंड बसते) |
| लाभव्यय गुणोत्तर | १.३६ > १.१० (मापदंडात बसते) |

d;Kharbhumi;Humane;Chichodi